**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (यां) पदावरील नियुक्तीचा महसूली संवर्ग बदलण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आपना २०१५/प्र.क्र.२७/पापु-१५**

७ वा मजला, गो.ते.रूग्णालय इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ११ सप्टेंबर, २०१५

**वाचा :-**

**१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. आपना २०१३/प्र.क्र.२४९/पापु-१५, दिनांक २१ जुलै, २०१४**

**प्रस्तावना :-**

श्री. निलेश शेषराव मानकर, यांची उप अभियंता (यां), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, हिंगोली येथे नियुक्ती करण्यात आली आहे. श्री. नि.शे. मानकर यांनी नियुक्ती संदर्भात औरंगाबाद महसूली विभागीय संवर्ग बदलून देण्याबाबत विनंती केली आहे. श्री. नि.शे.मानकर यांची नामनिर्देशनाने करण्यात आलेली नियुक्ती दिनांक ८.६.२०१० च्या अधिसूचनेनुसार व सामान्य प्रशासन विभागाने केलेल्या वाटपानुसार औरंगाबाद विभागीय संवर्गात करण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाची दिनांक ८.६.२०१० रोजीची अधिसूचना आता रद्दबातल झाली असून त्याऐवजी दिनांक २८.४.२०१५ रोजीची अधिसूचना अस्तित्वात आली आहे. सदर अधिसूचनेत नागपूर/अमरावती/औरंगाबाद विभागातील रिक्त पदे प्राथम्यक्रमाने भरण्याबाबत प्राथम्यक्रम देण्यात आला आहे. श्री. नि.शे.मानकर यांनी नक्षलग्रस्त विभागात काम करण्याबाबत सहमती दर्शविली आहे. त्यानुसार श्री. नि.शे.मानकर यांचा महसूली संवर्ग बदलून देण्याबाबतची विनंती विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

श्री. नि.शे.मानकर, उप अभियंता (यां) यांची संदर्भाधीन आदेशान्वये उप अभियंता (यां), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, हिंगोली येथे नियुक्ती करण्यात आली आहे. श्री. नि.शे.मानकर यांनी नक्षलग्रस्त विभागात काम करण्याबाबत सहमती दर्शविली आहे. त्या अनुषंगाने श्री. मानकर यांनी नागपूर विभागीय संवर्ग बदलून देण्यात यावा अशी विनंती केली आहे. त्यानुसार श्री. मानकर यांना त्यांच्या

नियुक्ती संदर्भातील औरंगाबाद महसूली विभागीय संवर्ग बदलून त्यांना नागपूर महसूली विभागीय संवर्ग बदलून देण्यात येत आहे. श्री. मानकर यांची उप अभियंता (यां), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, हिंगोली येथील नियुक्ती बदलून त्यांची नागपूर विभागातील गोंदिया, जिल्हा परिषद, देखभाल दुरूस्ती कक्षातील उप अभियंता (यां) या कार्यालयातील उप अभियंता (यां) या रिक्त पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.

श्री. मानकर यांना त्यांच्या विनंतीनुसार विभागीय संवर्ग बदलून देण्यात येत असल्याने त्यांना त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणात बदल झाल्याच्या अनुषंगाने कोणतेही वित्तीय लाभ / प्रवास भत्ता अनुज्ञेय असणार नाही. तसेच त्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय असणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०८१२२९१५७२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Laxman Pimple

Digitally signed by Deepak Laxman Pimple
DN: CN = Deepak Laxman Pimple, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.09.11 12:15:42 +05'30'

**( दिपक ल. पिंपळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, (सर्व)
३. श्री. नि.शे. मानकर, उप अभियंता (यां), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, हिंगोली (संचालकांमार्फत)
४. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली / गोंदिया
५. निवड नस्ती (पापु-१५)